**सन २०१७-१८ या वित्तीय वर्षासाठी महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई यांना जून २०१७ ते सप्टेंबर २०१७ या कालावधीसाठी सहाय्यक अनुदान वितरीत करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक :- केव्हीबी-२०१६/प्र.क्र. ६२/उद्योग-६.**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक :- २३ जून, २०१७.

<u>वाचा :</u> १) शासन परिपत्रक क्र. लेखाअ-२०१७/२०१७-२०१८/प्र.क्र.४१/प्रशासन-१, दि.०७/०४/२०१७.

२) शासन निर्णय क्र. केव्हिबी-२०१७/प्र.क्र.६२/उद्योग-६.

३) अर्थ सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ यांचे क्र. कार्यासन -९/लेखा/२३८०, १४ जून,२०१७ व क्र. कार्यासन -९/ लेखा/२३८२, दि. १४ जून,२०१७ चे पत्र.

<u>प्रस्तावना :-</u>

महाराष्ट्र विनियोजन (लेखानुदान), विधेयक, २०१६ महाराष्ट्र विधानमंडळाने मंजूर केले असून, सदर अधिनियमास अधिनियम २४ म्हणून महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण भाग-४, दिनांक २९/३/२०१७ मध्ये प्रसिध्द करण्यात आले असल्याचे उपरोक्त परिपत्रकान्वये कळविण्यात आले आहे. उपरोक्त क्र. २ येथील शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळास माहे एप्रिल, २०१७ ते माहे मे,२०१७ या २ महिन्यांकरिता ३६, सहायक अनुदान (वेतन) या उदिष्टाखाली रूपये ८,१९,३६,०००/-व ३१,सहायक अनुदान(वेतनेत्तर) या उदिष्टाखाली रू.४६,४८,०००/- असे एकूण रू.८,६५,८४०००/- इतके सहायक अनुदान मंडळास उपलब्ध करून देण्यात आले आहे. आता लेखा व लेखा परिक्षण अधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ यांनी माहे जून, २०१७ ते माहे सप्टेंबर, २०१७ या ४ महिन्याकरिता वेतन व वेतनेत्तर या बाबींसाठी सहायक अनुदान उपलब्ध करून देण्याची विनंती केली आहे.

**शासन निर्णय :-**

सन २०१७-१८ या वित्तीय वर्षाकरिता अर्थसंकल्पित केलेल्या तरतुदीपैकी माहे जून २०१७ ते माहे सप्टेंबर, २०१७ या ४ महिन्यांच्या कालावधीसाठी ३१, सहायक अनुदान (वेतनेतर) खर्च भागविण्यासाठी रूपये ९२,९६०००/- (रूपये ब्यांण्णव लाख शहाण्णव हजार फक्त) व ३६, सहायक अनुदान (वेतन) वेतन व भत्ते यावरील खर्च भागविण्यासाठी रूपये १६,३८,७२०००/- ( रूपये सोळा कोटी अडतीस लाख बहात्तर हजार फक्त) अशी एकूण रूपये १७,३१,६८,०००/- ( रूपये सतरा कोटी एकतीस लाख अडुसष्ट हजार फक्त) इतके सहाय्यक अनुदान उपलब्ध करून देण्याची विनंती मंडळाने केली आहे. त्यानुषंगाने मंडळास वेतन व वेतनेत्तर या बाबींकरिता एकूण रूपये १७,३१,६८,०००/- ( रूपये सतरा कोटी एकतीस लाख अडुसष्ट हजार फक्त) इतके अनुदान वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. यावरील खर्च मागणी क्रमांक के-७, २८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग, १०५ खादी व ग्रामोद्योग (००) (०१) खादी व ग्रामोद्योग मंडळाला सहाय्यक अनुदान (दत्तमत) (२८५१ ०५८५) ३६, सहाय्यक अनुदान (वेतन) व ३१-सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर) या उद्दिष्टांखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व तो त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. सदर रक्कमेच्या आहरण व संवितरणाचे अधिकार विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या कार्यालयातील लेखा अधिकारी यांना देण्यात आलेले आहेत. सदर अनुदान खर्च झाल्याबाबतचे विनियोग प्रमाणपत्र मंडळाने शासनास व आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना विहित कालावधीत सादर करावे. तसेच लेख्यांच्या खर्चमेळाबाबत महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई यांच्याकडून विचारणा करण्यात येईल, तेव्हा लेख्यासंबंधीची आवश्यक ती कागदपत्रे मंडळाने महालेखापाल कार्यालयास सादर करावीत.

४. सदर शासन निर्णय, शासन परिपत्रक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र. लेखाअ-२०१७/ २०१७-२०१८ /प्र.क्र.४१/ प्रशासन-१, दिनांक ०७ एप्रिल , २०१७ मधील निर्देशानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१७०६२३१११७०९५२१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Namdeo
Kondiba Bhosale

Digitally signed by Namdeo Kondiba Bhosale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=IEL Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8db1ca2341132b954db9052b5ef3bd93e7410456a96fa70df7ff81c68231fcd3, serialNumber=8c6a286229ecc7982a08553f49d547ef64be25c7f26fc96324ece7cccbfeb8c5, cn=Namdeo Kondiba Bhosale
Date: 2017.06.23 13:10:53 +05'30'

**( डॉ. ना. कों. भोसले)**
शासनाचे उपसचिव

प्रति :- माहितीसाठी व आवश्यक त्या उचित कार्यवाहीसाठी अग्रेषित :

१. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई (५ प्रती)
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई.
३. अर्थ सल्लागार व मुख्य लेखाधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
७. वरिष्ठ उप महालेखापाल (पडताळणी) बाह्य लेखा परीक्षा विभाग, मुंबई.
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९. लेखा अधिकारी, उद्योग संचालनालय, नवीन प्रशासन भवन, मुंबई.
१०. कार्यासन अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१६/अर्थसंकल्प-१४/अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई-३२.
११. कार्यासन अधिकारी (प्रशासन-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती (उद्योग-६).